**अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी (नागरी)**
**<u>घरकुल योजनेची अंमलबजावणी करणेबाबत</u>**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन पूरक पत्र- बीसीएच-२००९/ प्र.क्र १५९/मावक-२**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२**
**दिनांकः- २९ सप्टेंबर,२०११**

**वाचा : १)शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-बीसीएच-२००८/ प्र.क्र. ३६/ मावक-२, दिनांक १५ नोव्हेंबर,२००८.**
**२)शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-बीसीएच-२००९/ प्र.क्र. १५९/ मावक-२, दिनांक ९ मार्च,२०१०.**
**३)शासन पूरक पत्र क्रमांक,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-बीसीएच-२००९/प्र.क्र. १५९/ मावक-२, दिनांक ६ ऑगस्ट,२०१०.**
**४)शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-बीसीएच-२००९/ प्र.क्र. १५९/ मावक-२, दिनांक. २ डिसेंबर,२०१०.**
**५)शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-बीसीएच-२००९/ प्र.क्र. १५९/ मावक-२, दिनांक १४ मार्च,२०११.**
**६)शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-बीसीएच-२००९/ प्र.क्र. १५९/ मावक-२, दिनांक २ ऑगस्ट,२०११.**

**<u>प्रस्तावनाः-</u>** सामाजिक न्याय विभागामार्फत अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी घरकुल योजना राबविण्याकरिता दि. १५/११/२००८ व ९/३/२०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणी संदर्भात अनुक्रमांक ३ येथील पूरक पत्र दिनांक ६/८/२०१० अन्वये खालीलप्रमाणे सूचना देण्यात आली आहे:-

२. घरकुल योजनेस अनुसरुन शासनाकडे प्राप्त झालेल्या अर्जामधील पात्र अर्जदारापैकी ज्याची नावे दारिद्रय रेषेखालील कुटुंबाच्या यादीमध्ये सामाविष्ट आहेत, त्या लाभार्थीना प्रथम टप्प्यात सर्वोच्च प्राधान्य देण्यात येईल व त्यानंतरच दारिद्रय रेषेवरील पात्र अर्जदारांना दुस-या टप्प्यात लाभ देण्यात येईल. नगरपालिका व महानगरपालिका क्षेत्राकरिता वार्डनिहाय दारिद्रय रेषेखालील कुटुंबाची यादी विचारात घेण्यात यावी व त्यामध्ये दारिद्रय रेषेखालील कुटुंबांची संख्या चढत्या क्रमाने लावण्यात यावी. तद्नंतर दारिद्रय रेषेखालील कुटुंबांची कमी संख्या असलेल्या गावे व वार्डमधील पात्र लाभार्थ्यांना या योजनेचा लाभ देण्यात यावा व त्यानंतर चढत्या क्रमाने आलेल्या गावे व वार्डामधील पात्र लाभार्थीना लाभ देण्यात यावा.

३. या योजनेअंतर्गत नागरी भागामध्ये अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांतील दारिद्रय रेषेखालील पुरेसे लाभार्थी उपलब्ध होत नसल्याने नागरी क्षेत्रासाठी ठरविण्यात आलेले उद्दिष्ट पूर्ण होत नसल्याची बाब संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांनी शासनाच्या निर्देशनास आणलेली आहे. त्यामुळे नागरी भागाकरिता

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी घरकुल योजनेचा लाभ दारिद्रय रेषेवरील लाभार्थ्यांना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-** घरकुल योजनेतंर्गत संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांनी जाहिरात देऊन प्राप्त झालेल्या अर्जांपैकी नागरी भागातील पात्र लाभार्थ्यांना घरे बांधून देण्याचा कार्यक्रम तातडीने सुरु करावयाचा असल्याने अनुसूचित जाती व नवबौध्द प्रवर्गासाठी नागरी भागामध्ये घरकुल योजनेअंतर्गत दारिद्रयरेषेखालील पुरेसे लाभार्थी उपलब्ध होत नसल्याने **दारिद्रय रेषेवरील** लाभार्थ्यांना सुध्दा घरकुल योजनेचा लाभ देण्यात यावा. सदर लाभ देण्यासाठी शासन निर्णय दिनांक ९ मार्च, २०१० मध्ये नमूद केल्यानुसार अर्जदार हा अनुसूचित जातीचा व नवबौध्द घटकातील असावा व अर्जदाराच्या कुटुंबाची वार्षिक उत्पन्न मर्यादा व लाभार्थीचा हिस्सा खालीलप्रमाणे आहे:-

| क्षेत्र | उत्पन्न मर्यादा | घराच्या बांधकाम खर्चामध्ये लाभार्थी हिस्सा |
|---|---|---|
| नगरपरिषद क्षेत्र | रुपये १.५० लाख | ७.५ टक्के |
| महानगरपालिका क्षेत्र | रुपये २.०० लाख | १० टक्के |

नगरपालिका व महानगरपालिका क्षेत्रातील दारिद्रय रेषेखालील कुटुंबाला घरांच्या बांधकाम खर्चामध्ये लाभार्थी हिस्सा भरण्याची आवश्यकता नाही. याशिवाय नगरपरिषद/महानगरपालिका क्षेत्रात निकष पुर्ण करीत असलेल्या दारिद्रय रेषेखालील लाभार्थ्यांना प्राधान्य दयावे.

वरील निकषानुसार लाभार्थीची नागरी क्षेत्रासाठी निवड समितीने निवड करुन घरकुल योजनेसंदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करावयाची आहे.

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी घरकुल योजनेची अंमलबजावणी करणेबाबत शासन निर्णय. दिनांक ९ मार्च २०१० अन्वये नगरपरिषद क्षेत्र/महानगरपालिका क्षेत्रांसाठी परि. १४ ( ब) नुसार गठीत केलेल्या समितीची खालीलप्रमाणे पुर्नरचना करण्यात येत आहे -

| क्षेत्र | पदनाम | समितीचे पद |
|---|---|---|
| **नगरपरिषद** | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| | अतिरिक्त जिल्हाधिकारी | सदस्य |
| | तहसिलदार, वर्ग -१ | सदस्य |
| | संबधित रचनाकार | सदस्य |
| | मुख्य अधिकारी, नगरपरिषद | सदस्य |
| | प्रकल्प अधिकारी, जिल्हा नागरी विकास यंत्रणा (DUDA) | सदस्य |
| | विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी | सदस्य सचिव |

महानगरपालिका क्षेत्रासाठी शासन निर्णय दिनांक ९/०३/२०१० अन्वये नियुक्त करण्यात आलेल्या समितीत कोणताही बदल करण्यात आलेला नाही.

६. हे शासन पूरक पत्र महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०९२९१७०७०३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(दिनेश वाघमारे)
सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री , सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
प्रधान सचिव (वित्त),/प्रधान सचिव (नगर विकास विभाग), /प्रधान सचिव (ग्रामविकास)/सचिव (गृहनिर्माण),मंत्रालय .मुंबई-३२ यांचे स्वीय सहाय्यक
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
आयुक्त सर्व महानगर पालिका
महानगर आयुक्त, मुबई महानगर प्रादेशिक क्षेत्रविकास प्राधिकारण, बांद्रा -कुर्ला संकुल, मुंबई
संचालक, नगर पालिका प्रशासन, वरळी, मुंबई
उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण,बांद्रा-कुर्ला संकुल, मुंबई
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
सर्व प्रकल्प संचालक,जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा
प्रकल्प अधिकारी, जिल्हा नागरी विकास यंत्रणा (DUDA)
मुख्याधिकारी, सर्व नगर पालिका / नगर परिषद
वित्त विभाग (व्यय-१४/ अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व समाज कल्याण अधिकारी, गट-अ, जिल्हा परिषद
सर्व मंत्रालयीन विभाग
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
कक्ष अधिकारी, विधान मंडळ अनुसूचित जाती कल्याण समिती (डी-४), ५ वा मजला,विधानभवन, मुंबई-३२ (५ प्रतीसह)
निवड नस्ती, मावक-२